राज्यातील १० जिल्ह्यांमध्ये सार्वजनिक-खाजगी भागिदारी तत्त्वावर सघन कुक्कुट विकास गटाची (Intensive Poultry Development Blocks) स्थापना करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत......

महाराष्ट्र शासन
कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास, मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्र. कुक्कुट-२०१६/प्र.क्र. ११७/पदुम-४,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१६.

प्रस्तावना-

मा. मंत्री (वित्त) यांच्या २०१६ च्या अर्थसंकल्पिय भाषणात **“राज्यातील ३४ जिल्ह्यांपैकी १६ जिल्ह्यात सघन कुक्कुट विकास गटांची स्थापना करण्यात आलेली आहे. सन २०१६-१७ मध्ये आणखी १४ जिल्ह्यात सघन कुक्कुट विकास गटाची स्थापना करण्याचे प्रस्तावित आहे.”** अशी घोषणा केलेली आहे.

राज्यातील १४ जिल्ह्यांमध्ये सार्वजनिक-खाजगी भागिदारी तत्त्वावर सघन कुक्कुट विकास गटाची (Intensive Poultry Development Blocks) स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. दि. ८ नोव्हेंबर, २०१६ रोजी पार पडलेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत राज्यातील १४ जिल्ह्यांमध्ये सार्वजनिक-खाजगी भागिदारी तत्त्वावर सघन कुक्कुट विकास गटाची (Intensive Poultry Development Blocks) स्थापना करण्यास मंत्रिमंडळाने मान्यता प्रदान केलेली आहे. त्यानुषंगाने, खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील सिंधुदुर्ग, जालना, जळगांव, बुलडाणा, नंदुरबार, हिंगोली, चंद्रपूर, वर्धा, वाशिम, व ठाणे या १० जिल्ह्यांमध्ये सार्वजनिक-खाजगी भागिदारी तत्त्वावर सघन कुक्कुट विकास गटाची (Intensive Poultry Development Blocks) खालीलप्रमाणे विभागांतर्गत प्रति जिल्हा २ याप्रमाणे एकूण २० गटांची स्थापना करण्यास याद्वारे शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मुंबई विभाग | : सिंधुदुर्ग व ठाणे |
| औरंगाबाद विभाग | : जालना |
| नाशिक विभाग | : जळगाव व नंदुरबार |
| अमरावती विभाग | : बुलडाणा व वाशिम |
| लातूर विभाग | : हिंगोली |
| नागपूर विभाग | : वर्धा व चंद्रपुर |

**प्रकल्पांतर्गत विविध घटक व आर्थिक निकष:-**

या प्रकल्पाचे विविध घटक खालीलप्रमाणे आहेत.

| अ. क्र. | तपशील | शासन / लाभार्थी सहभाग | एकूण अंदाजित किंमत |
|---|---|---|---|
| १ | जमीन-२५०० चौ. फूट (१००० चौ. फूटचे २ शेड), खाद्य, अंडी साठवणूक व अंडी उबवणूक यंत्र ठेवण्यासाठी स्वतंत्र खोल्या | जमीन व खोल्या लाभार्थीच्या स्वत:च्या मालकीच्या असतील | निरंक |
| २ | प्रति १००० चौ. फूटाच्या २ पक्षीगृहाचे बांधकाम, स्टोअर रूम, पाण्याची टाकी, विद्युतीकरण | शासन + लाभार्थी | रू. ४,००,०००/- |
| ३ | खाद्य व पाण्याची भांडी, ब्रुडर, इतर उपकरणे व लसीकरण | शासन + लाभार्थी | रू. ५०,०००/- |
| ४ | लघु अंडी उबवणूक यंत्र (Mini Setter cum Hatcher) | शासन + लाभार्थी | रू. १,८०,०००/- |
| ५ | १००० एकदिवसीय मिश्र (नर +मादी) पिले प्रति पक्षी रू. ६०/- | शासन + लाभार्थी | रू. ६०,०००/- |
| ६ | २० आठवड्याचे अंड्यावरील ५०० पक्षी (नर+ मादी) प्रति पक्षी रू. १५०/- | शासन + लाभार्थी | रू. ७५,०००/- |
| ७ | उबवणूकीची अंडी ४०० प्रति अंडी रू. १०/- | शासन + लाभार्थी | रू. ४,०००/- |
| ८ | १००० एकदिवसीय पिलांसाठी २० आठवडे कालावधी पर्यंत पक्षी खाद्य पुरवठा (प्रति पक्षी एकूण ८.५० किग्रॅ खाद्य प्रति किलो रू. २५ /- दराने) | शासन + लाभार्थी | रू. २,१२,५००/- |
| ९ | एग नेस्ट्स | शासन + लाभार्थी | रू. ३०,०००/- |
| १० | पक्षी खाद्य ग्राईंडर (सिंगल फेज) | शासन + लाभार्थी | रू. १६,०००/- |
| | **एकूण** | | **रू. १०,२७,५००/-** |

**लाभार्थीचा आर्थिक सहभाग:-**

एकूण प्रकल्प किंमत रू. १०,२७,५००/- पैकी सर्वसाधारण लाभार्थीस ५० टक्के अनुदान रू. ५,१३,७५०/- व अनुसुचित जाती / जमातीच्या लाभार्थीस ७५ टक्के अनुदान रू. ७,७०,६२५/-देय राहील. उर्वरीत ५० टक्के / २५ टक्के रक्कम लाभार्थी स्वत:चा हिस्सा किंवा वित्तीय संस्थेकडून कर्ज घेऊन उभा करू शकेल.

**लाभार्थी निवड:-**

सर्वसाधारणपणे एकूण २० लाभार्थ्यांपैकी १० लाभार्थी हे सर्वसाधारण प्रवर्गातील, अनुसुचित जातीचे ४, अनुसुचित जमातीचे १ आणि महिला लाभार्थी ५ असतील. मात्र, उपरोक्त प्रमाणे लाभार्थी उपलब्ध होत नसल्यास सर्वसाधारण प्रवर्गातील लाभार्थ्यांची निवड करण्यात येईल.

सर्वसाधारण, अनुसुचित जाती उपयोजना व जनजाती क्षेत्र उपयोजनेतील जे लाभार्थी सद्यस्थितीत कुक्कुटपालन व्यवसाय करत आहेत तसेच, ज्या लाभार्थ्यांकडे लघु अंडी उबवणूक यंत्र आहे, अशा लाभार्थींना या योजनेंतर्गत प्राधान्य देण्यात यावे. या योजनेंतर्गत निवड झालेले लाभार्थी सद्यस्थितीत त्यांचेकडे उपलब्ध असलेले पक्षीगृह, स्टोअर रुम, पाण्याची टाकी, विद्युतीकरण, खाद्य व पाण्याची भांडी, ब्रुडर व इतर उपकरणे तसेच लघु अंडी उबवणी यंत्र यांचा वापर या योजनेसाठी करणार असतील तर त्यांना संबंधित बाबींसाठी देय अनुदान अनुज्ञेय राहणार नाही.

**लाभार्थ्यांना कुक्कुटपालन विषयक प्रशिक्षण:-**

निवडलेल्या लाभार्थ्यांना कुक्कुटपालन विषयक ५ दिवसांचे प्रशिक्षण नजीकच्या सघन कुक्कुट विकास प्रकल्पांमध्ये आयोजित करण्यात यावे. यामध्ये अंड्यावरील पक्ष्यांच्या विविध जाती, त्यांचे संगोपन, निवारा, खाद्य व पाणी देण्याच्या पद्धती, खाद्याचे प्रकार, विविध रोग प्रतिबंधक लसीकरण, उबवणूकीच्या अंड्यापासून पक्ष्यांची निर्मिती, अंडी, नर पक्षी, तलंगा, एकदिवसीय पक्ष्यांची विक्री व्यवस्था उपलब्ध बाजारपेठ इ. बाबींचा समावेश असावा. यासोबतच खाजगी अंडी उबवणुक केंद्रे / शासकीय अंडी उबवणूक केंद्र / लघु अंडी उबवणूक यंत्राचा वापर करत असलेल्या लाभार्थ्यांच्या प्रक्षेत्रावर भेट देखील आयोजित करण्यात यावी. लाभार्थ्यांच्या प्रशिक्षणावर होणारा खर्च प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिवस रू. ४५०/- याप्रमाणे आत्मा योजनेतील निकषानुसार शासनाच्या १०० टक्के अनुदानातुन भागविण्यात यावा.

**योजना अंमलबजावणी अधिकारी:-**

संबंधित जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त हे सदर योजनेचे अंमलबजावणी अधिकारी असतील.

**योजनेंतर्गत लाभार्थी निवड समिती:-**

या योजनेंतर्गत लाभार्थ्यांची निवड संबंधित जिल्ह्याचे जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे गठित करण्यात आलेल्या लाभार्थी निवड समितीमार्फत करण्यात यावी.

| | | |
|---|---|---|
| १) | जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त | अध्यक्ष |
| २) | विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी (राज्यस्तर) | सदस्य |
| ३) | प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ४) | जिल्हा महिला व बाल कल्याण अधिकारी (राज्यस्तर) | सदस्य |
| ५) | जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार अधिकारी | सदस्य |
| ६) | जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी | सदस्य |
| ७) | सहायक आयुक्त पशुसंवर्धन, जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त कार्यालय | सदस्य सचिव |

**राज्यावर येणारा आर्थिक भार:-**

या योजनेसाठी सन २०१६-१७ च्या अर्थसंकल्पामध्ये योजनेत्तर योजनेंतर्गत संकेतांक क्र. २४०३ ०४८ १ या अंतर्गत पुरवठा व सामग्री, लहान बांधकामे, यंत्रसामग्री व साधनसामग्री, पशुधन या विविध खर्चांच्या बाबीखाली एकूण रू. ५११३.१४ लक्ष निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यामुळे लाभार्थ्यांना द्यावयाचे अनुदानाचा खर्च यामधुन भागविण्यात यावा. प्रशिक्षणाचा खर्च हा एकदाच करावा लागणार असल्याने एक विशेष बाब म्हणून सदर लेखाशीर्षाखालील मजुरी या उपशीर्षातुन भागविण्यात यावा.

**(अ) या योजनेमध्ये लाभार्थींना अनुदान पोटी द्यावयाच्या रकमेचा तपशील:-**

| अ. क्र. | अनुदान द्यावयाची बाब | सर्वसाधारण | | अनुसुचित जाती / अनुसुचित जमाती/ महिला | |
|---|---|---|---|---|---|
| | | लाभार्थी संख्या | देय अनुदान | लाभार्थी संख्या | देय अनुदान |
| १ | प्रति १००० चौ. फूटाच्या २ पक्षीगृहाचे बांधकाम, स्टोअर रूम, पाण्याची टाकी, विद्युतीकरण | १० | रू. २० लक्ष | १० | रू. ३०.०० लक्ष |
| २ | खाद्य व पाण्याची भांडी, ब्रुडर, इतर उपकरणे व लसीकरण | १० | रू. २.५० लक्ष | १० | रू. ३.७५ लक्ष |
| ३ | १००० एकदिवसीय मिश्र (नर +मादी) पिले प्रति पक्षी रू. ६०/- | १० | रू. ३.०० लक्ष | १० | रू. ४.५० लक्ष |
| ४ | लघु अंडी उबवणूक यंत्र (Mini Setter cum Hatcher) | १० | रू. ९.०० लक्ष | १० | रू. १३.५० लक्ष |
| ५ | २० आठवड्याचे अंड्यावरील ५०० पक्षी (नर+ मादी) प्रति पक्षी रू. १५०/- | १० | रू. ३.७५ लक्ष | १० | रू. ५.६२५ लक्ष |
| ६ | उबवणूकीची अंडी ४०० प्रति अंडी रू. १०/- | १० | रू. ०.२० लक्ष | १० | रू. ०.३० लक्ष |
| ७ | १००० एकदिवसीय पिलांसाठी २० आठवडे कालावधी पर्यंत पक्षी खाद्य पुरवठा (प्रति पक्षी एकूण ८.५० किग्रॅ खाद्य प्रति किलो रू. २५ /- दराने) | १० | रू. १०.६२५ लक्ष | १० | रू. १५.९३७५ लक्ष |
| ८ | एग नेस्ट्स | १० | रू. १.५० लक्ष | १० | रू.२.२५ लक्ष |
| ९ | पक्षी खाद्य ग्राईंडर (सिंगल फेज) | १० | रू. ०.८० लक्ष | १४ | रू.१.२० लक्ष |
| **एकूण** | | | **रू.५१.३७५ लक्ष** | | **रू. ७७.०६२५ लक्ष** |
| | | | **रू.१२८.४३७५ लक्ष** | | |

महिला लाभार्थींची ज्या प्रवर्गातुन निवड होईल त्याप्रमाणे त्यांना अनुदान देय होईल.

**(ब) लाभार्थी प्रशिक्षण खर्च (१०० टक्के शासनाचे अनुदान)**

| अ.क्र. | बाब | लाभार्थी संख्या | एकूण रक्कम |
|---|---|---|---|
| १ | ५ दिवसाचे कुक्कुटविषयक प्रशिक्षण (प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिवस रू. ४५०/- प्रमाणे) | २० | रू. ४५,०००/- |

प्रकल्प कार्यान्वित करताना एकदाच शासनाचे अनुदान देय असून तद्नंतर प्रकल्प सुरळीतरित्या चालू राहण्यासाठी पुढील खर्च संपूर्णपणे लाभार्थ्याने करावयाचा आहे.

राज्यातील १० जिल्ह्यांमध्ये सार्वजनिक-खाजगी भागिदारी तत्त्वावर २० सघन कुक्कुट विकास गटांची (Intensive Poultry Development Blocks) स्थापना करण्याच्या अनुषंगाने आवश्यक त्या सविस्तर मार्गदर्शक सुचना आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तात्काळ निर्गमीत कराव्यात.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असुन त्याचा संकेतांक क्र. २०१६११२९१६४७४३५४०१ आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमीत करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशाने व नावाने,**

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: CN = Shashank Madhav Sathe, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2016.11.29 16:51:10 +05'30'

**(श. मा. साठे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
२) मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
३) मा. मंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
४) मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई-३२.
५) वित्त विभाग (कार्यासन व्यय-२/अर्थसंकल्प-१५) मंत्रालय, मुंबई ३२.
६) नियोजन विभाग (कार्यासन- १४३१) मंत्रालय, मुंबई ३२
७) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, औंध, पुणे-७.
८) विभागीय आयुक्त, (सर्व).
९) जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग, जालना, जळगांव, बुलडाणा, नंदुरबार, हिंगोली, चंद्रपूर, वर्धा, वाशिम, व ठाणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग, जालना, जळगांव, बुलडाणा, नंदुरबार, हिंगोली, चंद्रपूर, वर्धा, वाशिम, व ठाणे
११) प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१३) प्रादेशिक सहआयुक्त पशुसंवर्धन, (सर्व).
१४) जिल्हा पशुसंवर्धन उपायुक्त, सिंधुदुर्ग, जालना, जळगांव, बुलडाणा, नंदुरबार, हिंगोली, चंद्रपूर, वर्धा, वाशिम, व ठाणे
१५) जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग, जालना, जळगांव, बुलडाणा, नंदुरबार, हिंगोली, चंद्रपूर, वर्धा, वाशिम, व ठाणे /निवडनस्ती (पदुम-४)